**सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत विविध आरोग्य संस्थांतील वाहनांचे सुटे भाग, साहित्य व टायर ट्युब यांच्या खरेदीसाठी उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ) पुणे यांना प्राधिकृत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांकः परिवहन-२०१३/ प्र.क्र. ४६५/ आरोग्य-४**
मंत्रालय,१० वा मजला, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीखः २१ जुलै, २०१४.

वाचा

**१) शासन निर्णय, सा.आ.वि.,क्रमांकः परिवहन-२०१३/ प्र.क्र. ४६५/ आरोग्य-४, दिनांक ४.०१.२०१४.**

**प्रस्तावना**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत विविध आरोग्य संस्थांतील वाहनांचे सुटे भाग, साहित्य व टायर ट्युब यांच्या खरेदीच्या प्रस्तावास मान्यता देण्यामध्ये होणारा कालापव्यय टाळण्याच्या दृष्टीकोनातून या खरेदीसाठी उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे यांना प्राधिकृत करण्यात आले आहे. तथापि, या शासन निर्णयात नमूद सुटे भाग, साहित्य यांमध्ये वाहनांकरीता लागणाऱ्या बॅटरीचा स्पष्टपणे उल्लेख करण्यात आला नव्हता. याबाबतची संदिग्धता दुर करण्याकरीता सदर शासन निर्णयातील नमूद सुटे भाग, साहित्य यासोबत वाहनांकरीता लागणाऱ्या बॅटरीचा या शासन निर्णयात समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुद्धीपत्रक**

संदर्भाधीन शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांक परिवहन-२०१३/ प्र.क्र.४६५/ आरोग्य-४, दिनांक ४.०१.२०१४ मधील परिच्छेद १ मध्ये नमूद केलेल्या सार्वजनिक आरोग्य विभागाच्या कार्यकक्षेतील विविध आरोग्य संस्थांमध्ये वापरात असणाऱ्या वाहनांच्या देखभाल व दुरूस्तीसाठी आवश्यक असणाऱ्या वाहनांचे विविध प्रकारचे सुटे भाग यामध्ये वाहनांकरीता लागणाऱ्या बॅटरींचा समावेश करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२१११४२२९७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TAKATE PARAJI M

Digitally signed by TAKATE PARAJI M
DN: CN = TAKATE PARAJI M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.07.22 11:27:33 +05'30'

**पा.म.ताकटे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. नियंत्रक (लेखापरिक्षा व लेखा) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
४. उपसंचालक, आरोग्य सेवा, ठाणे मंडळ, नाशिक मंडळ, पुणे मंडळ, कोल्हापूर मंडळ, औरंगाबाद मंडळ, लातूर मंडळ, अकोला मंडळ, नागपूर मंडळ.
५. महालेखापाल १/ २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरीक्षा )/ ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
६. अवर सचिव/ कक्ष अधिकारी ( आरोग्य-३/ आरोग्य-३ अ/ अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती (आरोग्य- ४).